# माळरानातले रिंगण

## एक शॉनी आदिवासी लोककथा



संपादन- जॉन बियरहोर्स्ट
चित्रे- लिओ व डायन डिलॉन
मराठी अनुवाद- सानिया



पशुपक्ष्यांनी गजबजलेल्या एका घनदाट जंगलात वाउपी नावाचा एक तरुण शिकारी राहत असे. वाउपी नावाचा अर्थ आहे पांढरा बहिरी ससाणा. उंच, धिप्पाड, चमकदार डोळ्यांचा वाउपी जंगलातल्या काट्याकुट्यांतून मुक्त संचार करत असे. तो कुठल्याही पक्ष्याचा अथवा प्राण्याचा माग काढू शकत असे. वाउपी त्याच्या कळपातला सर्वात कुशल शिकारी होता. दररोज एखादी चांगली शिकार मिळवूनच तो पाड्यावर परतत असे.

एके दिवशी वाउपी शिकारीच्या शोधात आपल्या पाड्यापासून खूप लांब गेला. जंगल हळूहळू विरळ होत गेले. आकाशातली सूर्यकिरणे झाडांना छेदून थेट जमिनीवर येऊ लागली. थोड्याच वेळात वाउपी गवत आणि रानफुलांनी भरलेल्या एका माळरानापाशी येऊन पोहचला.



वाउपी माळरानावर इकडे तिकडे भटकू लागला. तेवढ्यात त्याला गवतात एक मोठे रिंगण दिसले. जणू काही ते पावलांनी चालून चालून तयार झाले होते.

पण त्या रिंगणापर्यंत जाण्यासाठी कुठलीच पायवाट नव्हती. अवतीभवती पाऊलखुणांचा मागमूस नव्हता. आजूबाजूचे गवतदेखील जराही तुडवले गेले नव्हते.



वाउपीने त्या रहस्यमय रिंगणाचा शोध लावण्याचा निश्चय केला आणि तो जवळच्या उंच गवतात लपून बसला. हलकीशी संगीताची धून त्याच्या कानावर पडली. वर पाहिले असता त्याला आकाशातून एक चमत्कारिक वस्तू खाली येताना दिसली. सुरुवातीला ठिपक्याएवढी दिसणारी ती वस्तू हळूहळू मोठी होऊ लागली आणि लवकरच तिचे एका अजस्त्र टोपलीमध्ये रुपांतर झाले. त्या टोपलीत एकापेक्षा एक रूपवान अशा बारा बहिणी बसल्या होत्या.

टोपली जमिनीच्या जवळ येऊ लागली तसे संगीत अधिक स्पष्ट आणि मधुर ऐकू येऊ लागले. ती जमिनीला स्पर्श करताच बारा बहिणी झरझर खाली उतरल्या आणि रिंगणाभोवती फेर धरून नाचू लागल्या. नाचता नाचता आपल्या हातातल्या लांबसडक काठ्यांनी रिंगणाच्या मध्यभागी ठेवलेल्या चेंडूला ढोलाप्रमाणे बडवू लागल्या.

गवताच्या आडून वाउपी त्यांच्या डौलदार हालचाली निरखू लागला. त्या सगळ्याच त्याला आवडल्या पण सर्वात लहान बहिण मात्र त्याच्या जास्तच मनात भरली.





अखेर त्याचा संयम सुटला आणि तो त्यांच्या दिशेने धावू लागला. त्याने सर्वात लहान बहिणीचा हात पकडायचा प्रयत्न केला. पण त्या सगळ्या बहिणी पाखरांच्या चपळाईने टोपलीत चढल्या आणि आकाशात दिसेनाश्या झाल्या.

“त्या निघून गेल्या!” तो हताशपणे म्हणाला. “आता मला त्यांना पुन्हा कधीच बघता येणार नाही.” निराश मनाने वाउपी आपल्या झोपडीत परतला. त्या रात्री त्याला जराही झोप लागली नाही.



दुसऱ्या दिवशी पहाटेच वाउपी माळरानातल्या रिंगणापाशी गेला. तिथून काही अंतरावर त्याला एक झाडाचा बुंधा सापडला ज्यात अनेक उंदीर लपून बसले होते. या छोट्याशा जीवांना बहिणी घाबरणार नाहीत असा विचार करून त्याने तो बुंधा रिंगणाच्या जवळ आणला.



वाउपीने आपले रूप बदलले आणि क्षणार्धात तो त्या उंदरांपैकी एक बनून गेला. थोड्याच वेळात बारा बहिणी जमिनीवर उतरल्या. रिंगणाभोवती फेर धरून नाचू लागल्या.

“तिकडे पहा!” सर्वात धाकटी बहिण ओरडली.



“हा बुंधा आधी तर इथे नव्हता.” ती भीतीने टोपलीच्या दिशेने धावू लागली. ते पाहून बाकी सगळ्या नुसत्याच हसल्या आणि बुंध्याभोवती गोळा होऊन हातातल्या काठ्या आपटू लागल्या. त्यासरशी वाउपीसकट बुंध्यातले सगळे उंदीर सैरावैरा धावू लागले. थोड्याच वेळात बहिणींनी सगळ्यांना ठार केले. एक उंदीर तेवढा त्यांच्या तावडीतून निसटला. धाकटी बहिण त्याचा पाठलाग करू लागली. तिने हातातली काठी उगारल्याबरोबर वाउपीने आपले मूळ रूप धारण केले आणि तिचा हात पकडला. बाकी अकरा बहिणींनी पटापट टोपलीत उड्या टाकल्या आणि त्या आकाशाच्या दिशेने रवाना झाल्या.





वाउपीने आपल्या होणाऱ्या पत्नीचे मन जिंकण्यासाठी आटोकाट प्रयत्न केले. त्याने हलकेच तिचे डोळे पुसले. आपल्या शिकारीवरच्या साहसकथा आणि पृथ्वीवरील अद्‌भुत जीवसृष्टीच्या कहाण्या सांगून तिचे मन रिझवले.

तिचे लक्ष वेधून घेण्यासाठी तो अथक प्रयत्न करत राहिला. हळुवारपणे त्याने तिला आपल्या झोपडीकडे जाणारी वाट दाखवली. तिने झोपडीमधे प्रवेश करताच त्याचे मन आनंदाने भरून पावले. त्या क्षणापासून तो जगातला सर्वात सुखी मनुष्य झाला.

हिवाळा आणि उन्हाळा झरझर निघून गेला. एका गोंडस मुलाच्या जन्माने त्यांच्या आनंदात आणखी भर पडली. वाउपीची पत्नी एका ताऱ्याची मुलगी होती. आता हळूहळू तिला पृथ्वीवरच्या आयुष्याचा कंटाळा येऊ लागला आणि आपल्या आकाशातल्या घरी परतायची ओढ लागली. आकाशातल्या घरी जाण्यासाठीचा मंत्र ती अजून विसरली नव्हती. वाउपी बाहेर शिकारीसाठी गेलेला असे तेव्हा ती संधी साधून तिने एक वेताची टोपली विणायला घेतली होती. वाउपी घरी यायच्या आत ती टोपलीला सुखरूप जागी लपवून ठेवी. त्याच बरोबर एका बाजूला आपल्या बाबांसाठी भेटवस्तू म्हणून तिने पृथ्वीवरचे दुर्मिळ नमुने आणि स्वादिष्ट खाद्य पदार्थ जमवायला सुरुवात केली होती.





एके दिवशी सगळी तयारी झाल्यावर ती आपल्या मुलाला घेऊन माळरानातल्या रिंगणापाशी गेली. दोघे टोपलीत बसले आणि मग तिने गाणे गायला सुरुवात केली. हवेच्या झुळूकीसोबत ती संगीताची धून वाउपीच्या कानावर गेली. ही धून त्याच्या चांगल्याच परिचयाची होती. वाउपी रिंगणाच्या दिशेने धावत सुटला. पण तो रिंगणापाशी पोहचायच्या आतच टोपलीने हवेत झेप घेतली होती. त्याने त्यांना जोरजोरात हाका मारल्या पण टोपली वर वर जातच राहिली. टोपली अगदी छोट्याशा ठिपक्याएवढी दिसेपर्यंत तो वर बघत राहिला. अखेर ती दिसेनाशी झाली. बिचारा वाउपी! डोक्याला हात लावून तो कितीतरी वेळ तसाच बसून राहिला.

पत्नी आणि मुलाच्या वियोगाने वाउपी प्रचंड दुःखी झाला. प्रदीर्घ हिवाळा आणि उन्हाळा कसाबसा संपला. पत्नीच्या जाण्याचा तो शोक करी पण मुलाच्या आठवणीने तर त्याचा जीव अजूनच कासावीस होई. दरम्यान त्याची पत्नी तारकांमधल्या आपल्या घरी पोहचली होती. तिथल्या आनंददायी गाठीभेटी आणि लगबगीमधे तिला आपण आपल्या पतीला पृथ्वीवर सोडून आलो आहोत याचा जवळपास विसरच पडला होता. आपल्या मुलाला बघितले की मात्र तिला वाउपीची आठवण येई. मुलगा जसजसा मोठा होऊ लागला तसतशी त्याला आपल्या मातृभूमीविषयी ओढ वाटू लागली.





एके दिवशी तारा त्याच्या मुलीला म्हणाला, “जा बाळा, तुझ्या मुलाला त्याच्या वडिलांकडे घेऊन जा. आणि मग तुझ्या पतीला आपल्यासोबत राहण्यासाठी वरती घेऊन ये. पण येताना त्याला तो ज्या पशु पक्ष्यांची शिकार त्या सगळ्या प्रजातींचा एक एक नमुना घेऊन यायला सांग.”

मुलाला सोबत घेऊन ताऱ्याची मुलगी पुन्हा एकदा पृथ्वीच्या दिशेने रवाना झाली. वाउपी नेहमीच रिंगणाच्या आसपास घुटमळत असे. संगीताची धून कानावर पडताच त्याने वर बघितले. आपल्या पत्नी आणि मुलाला खाली येताना पाहून त्याचे हृदय आनंदाने जोरजोरात धडधडू लागले. त्या दोघांना त्याने घट्ट मिठी मारली.



जेव्हा वाउपीला त्याच्या पत्नीने ताऱ्याच्या विनंतीबद्दल सांगितले तेव्हा तो उत्साहाने भेटवस्तू गोळा करण्याच्या मोहिमेवर निघाला. पुढचे अनेक दिवस आणि संपूर्ण रात्रीसुद्धा त्याने सुंदर दुर्मिळ पशु पक्ष्यांचा माग काढण्यात घालवल्या. त्याने प्रत्येक प्राण्याची शेपटी, पंजा किंवा पंख सोबत घेतले. सगळी जमवाजमव झाल्यावर सारे कुटुंब रिंगणापाशी गेले आणि त्यांनी आकाशाच्या दिशेने उड्डाण केले.



त्यांना बघून सर्व तारे तारका खूप खुश झाल्या. ताऱ्यांच्या सरदाराने एका मेजवानीचे आयोजन केले आणि सर्वांना आमंत्रण दिले. सर्व जण जमल्यावर पृथ्वीवरून आणलेल्या भेटवस्तूंपैकी आवडलेल्या वस्तू प्रत्येक जण घेऊ शकतो अशी त्याने घोषणा केली.

भलतीच झुंबड उडाली. कुणी पाय निवडला. कुणी शेपटी, पंख तर कुणी पंजा उचलला. ज्यांनी शेपटी किंवा पंजा घेतला त्यांचे प्राण्यांमध्ये रुपांतर झाले आणि ते इकडे तिकडे बागडू लागले. बाकीचे पक्षी बनून भराऱ्या घेऊ लागले. वाउपीने पांढऱ्या ससाण्याचे पीस निवडले. त्याच्या पत्नीने आणि मुलानेही तेच केले.





लगेच त्यांचे पांढऱ्या ससाण्यांमधे रुपांतर झाले. त्यांनी आपले विशाल पंख पसरले आणि इतर पक्ष्यांसोबत पृथ्वीच्या दिशेने भरारी घेतली. आजही ते आपल्या नजरेस पडतात.

समाप्त